तालुका, जिल्हा आणि राज्यस्तरावरील
बैठकांमध्ये वृक्ष लागवड आणि संगोपन हा मुद्दा
स्थायी विषय म्हणून, बैठकांच्या
विषयसूचीमध्ये आणि क्षेत्रीय स्तरावरील
निरिक्षण भेटीमध्ये अंतर्भूत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

### शासन परिपत्रक क्रमांकः **संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२२/पापु-०२**

७ वा मजला, जी.टी.रूग्णालय संकुल, क्रॉफर्ड मार्केटजवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ०१.
तारीख: ११ मे २०१८.

**वाचा -**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक साववि-२०१५/प्र.क्र.१३१/फ-११, दिनांक ३१ मार्च, २०१६.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक साववि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दिनांक १० ऑक्टोबर, २०१६.

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक साववि-२०१६/प्र.क्र.१६६/फ-११, दिनांक ०४ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना -**

हवामान आणि ऋतूबदल, वाढते तापमान, दुष्काळ आणि पाण्याचे दुर्भिक्ष या नैसर्गिक आपत्तींची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी “हरित महाराष्ट्र” ही संकल्पना राबविण्याचा महत्वपूर्ण निर्णय शासनाने घेतला आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१७ ते २०१९ या कालावधीत ५० कोटी वृक्ष लागवडीचे उद्दीष्ट ठरविण्यात आले असून, सन २०१७ मध्ये ४ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाची अंमलबजावणी झाली आहे. त्याशिवाय सन २०१६ मध्ये दिनांक ०१ जुलै, २०१६ या एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवडीचा महत्वाकांक्षी कार्यक्रम कार्यान्वित करण्यात आला.

२. सन २०१८ आणि सन २०१९ मध्ये अनुक्रमे १३ कोटी व ३३ कोटी वृक्ष लागवडीचे उद्दीष्ट आहे. वृक्ष लागवडीचे उद्दीष्ट पूर्णपणे साध्य व्हावे आणि त्याचबरोबर आतापर्यंत लागवड केलेल्या झाडांचे संरक्षण, देखभाल आणि संगोपन उत्तमरितीने होणे हे अत्यंत गरजेचे आहे. दिनांक ०१ जुलै, २०१७ ते ०७ जुलै,

२०१७ या कालावधीमध्ये ४ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाचे सादरीकरण मा.मंत्रीमंडळासमोर दिनांक १३ जून, २०१७ रोजी करण्यात आले. त्यावेळी झालेल्या चर्चेनुसार यासंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत मा.मंत्रीमंडळाने दिलेल्या सूचना प्रशासकीय विभाग व क्षेत्रीय कार्यालयांना कळविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार या परिपत्रकाद्वारे पुढीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहे.

**परिपत्रक-**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत क्षेत्रीय स्तरावरील तालुका, जिल्हा व राज्यस्तरिय बैठकांमध्ये वृक्ष लागवड आणि संगोपण या संदर्भातील विषय, प्रत्येक बैठकांच्यावेळी विषयसूचीमध्ये, स्थायी विषय म्हणून अंतर्भूत करण्यात यावा. अशा बैठकांमध्ये वृक्ष लागवडीचा आढावा, यापूर्वी लागवड केलेल्या झाडांचे जिवंत राहण्याचे प्रमाण, मृत झाडांच्या जागी नवीन झाडांची लागवड, पुढील वर्षामध्ये वृक्ष लागवडीच्या उद्दीष्टाप्रमाणे वृक्षारोपणासाठी स्थळ निश्चिती, रोपांची उपलब्धता, आवश्यक त्या तांत्रिक परिमाणाप्रमाणे विहित कालावधीमध्ये खड्डे तयार करणे, निधीची उपलब्धता इत्यादी संदर्भात पूर्वतयारी करण्याबाबत आढावा घेण्यात यावा.

२. बैठकांमध्ये वृक्ष लागवड कार्यक्रमासंदर्भात झालेल्या निर्णयांची नोंद बैठकीच्या इतिवृत्तामध्ये करण्यात यावी. तसेच इतिवृत्तामध्ये नमूद केलेल्या निर्णयासंदर्भात झालेल्या अंमलबजावणीबाबत आणि येणाऱ्या अडचणी संदर्भात पुढील बैठकीमध्ये चर्चा करून क्षेत्रीय अधिकाऱ्यांना येणाऱ्या समस्या आणि अडचणी सोडविण्यासाठी उपाययोजना करण्यात याव्यात.

३. तालुका, जिल्हा व राज्यस्तरावरील जे अधिकारी क्षेत्रीय कामांना भेटी देतील, त्यावेळी त्या त्या विभागांतर्गत वृक्ष लागवडीच्या स्थळांना आवर्जुन भेटी देण्याचा कार्यक्रम आयोजित करण्यात यावा. अशा क्षेत्रीय भेटीच्या वेळी संबंधित प्रशासकीय विभागांतर्गत लावलेल्या झाडांचे संरक्षण योग्यरितीने होते किंवा नाही, मृत झाडांच्या जागी नवीन झाडे लावली गेली किंवा नाही, पाण्याची व्यवस्था आणि संरक्षणासाठी मनुष्यबळ इत्यादी बाबींची वरिष्ठ अधिकाऱ्यांनी पाहणी करावी. त्याचप्रमाणे येणाऱ्या अडचणी सोडविण्याबाबत उपाययोजना कराव्यात.

४. प्रस्तावित वृक्ष लागवडीसाठी निवडलेली स्थळे, आवश्यक त्या परिमाणाचे खड्डे विहित वेळेत तयार करणे आणि अशा स्थळांवर लावण्यात येणाऱ्या झाडांसाठी पाण्याची आणि संरक्षण व्यवस्था, वृक्ष लागवडीसाठी निधीची व्यवस्था याबाबत पाहणी करून क्षेत्रीय अधिकाऱ्यांना आवश्यक ते मार्गदर्शन द्यावे

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२८१२५२००९१२८ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, serialNumber=14841ecd32c757d5bdc1bc806fcf798e88e12bf053f8b2c43a5b1825ab9eb880, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2018.06.28 16:17:09 +05'30'

( म.भ. सावंत )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सर्व प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, सर्व.
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
५. जिल्हाधिकारी, सर्व.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य पुणे.
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा.
१०.सर्व उप सचिव/मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी/अवर सचिव/कक्ष अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी/लेखा अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
१३. निवड नस्ती (कार्यासन पापु-०२).